**राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातंर्गत (NMSA) परंपरागत कृषि विकास योजना (PKVY) सन २०२०-२१ मध्ये राबविण्याकरिता प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : योजना ३३२०/ प्र.क्र. ७४/१-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०००३२

दिनांक : ०३ सप्टेंबर २०२०

**वाचा :**१) केंद्र शासनाने DAC Website: agricoop.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या परंपरागत कृषि विकास योजनेच्या मार्गदर्शक सूचना.

२) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.सेंशेयो /१२१४/प्र.क्र.२६६/१७अे, दि.२०.०२.२०१६

३) केंद्र शासनाचे पत्र क्र.९-३९/२०१५/Org.Fmg, दि.०२ जुन, २०१७.

४) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.सेंशेयो १२१६/प्र.क्र.१४५/१७अे, दि.०७.०८.२०१७

५) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.पुरक २५१७/प्र.क्र.१२३/१७अे, दि.०७.१२.२०१७

६) केंद्र शासनाचे पत्र क्र. ९-३५/२०१५-Org.Fmg(i), दि. २८ फेब्रुवारी, २०२०

७) केंद्र शासनाचे पत्र क्र. ९-३५/२०१५-Org.Fmg(ii), दि. २८ फेब्रुवारी, २०२०

८) केंद्र शासनाचे पत्र क्र. ९-३५/२०१५-Org.Fmg(iii), दि. २८ फेब्रुवारी, २०२०

९) कृषी व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.योजना३३२०/प्र.क्र.२५/१अे, दि.२०.०३.२०२०

१०) केंद्र शासनाचे पत्र क्र. ९-३५/२०१५-Org.Fmg, दि. ०८ मे, २०२०

११) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/पीकेव्हीवाय/पुर्नजिवित/१६३२४/२०२०, दि. १० जुलै, २०२०

**प्रस्तावना -:**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना ही गटशेती आधारित सेंद्रीय शेती योजना केंद्र हिस्सा ६० टक्के व राज्य हिस्सा ४० टक्के या प्रमाणात राज्यात राबविण्यात येत आहे. योजनेच्या माध्यमातून व्यावसायिक सेंद्रीय शेतीस व सेंद्रीय निविष्ठा वापरण्यास प्रोत्साहन देणे, सहभाग हमी पध्दतीने प्रमाणीकरण करणे, शेतकऱ्यांच्या शेतावर सेंद्रीय शेती निविष्ठा तयार करणे, रासायनिक किटकनाशके उर्वरित अंशमुक्त शेतमाल ग्राहकास उपलबध करून देणे, सेंद्रीय शेती ग्राम विकसीत करणे तसेच सेंद्रीय शेतीवर आधारित प्रशिक्षण व प्रात्यक्षिक घेणे, कमी खर्चाच्या तंत्रज्ञानाचा अवलंब करुन शेतकऱ्यांचा उत्पादन खर्च कमी करून आर्थिक उत्पन्न वाढविणे या बाबी योजनेत समाविष्ट आहेत. योजनेंतर्गत पहिल्या टप्प्यात ९३२ व दुसऱ्या टप्प्यात ३२६ अशा एकूण १२५८ गटांची स्थापना झालेली आहे.

सन २०१६-१७ मध्ये परंपरागत कृषि विकास योजनेअंतर्गत प्रथम टप्प्यात ९३२ गट स्थापन करण्यात आले आहेत. त्याकरीता प्रथम वर्षातील घटक राबविणेसाठी संदर्भ क्र. २ वरील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून व्दितीय वर्षातील घटक राबवीणेसाठी संदर्भ क्र. ४ व ५ वरील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाच्या संदर्भ क्र. ६ ते ८ वरील पत्रानुसार सन २०१९-२० मध्ये सदर योजनेकरिता घटकनिहाय केंद्रहिस्स्याचा निधी प्राप्त झाला असून त्यास पुरक राज्य हिस्सा पुढीलप्रमाणे आहे.

(रु.लाख)

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा (६० टक्के) | राज्य हिस्सा (४० टक्के) | एकूण |
|---|---|---|---|
| सर्वसाधारण | १४८९.७० | ९९३.१४ | २४८२.८४ |
| अनु. जाती | १२९.६१ | ८६.४१ | २१६.०२ |
| अनु. जमाती | १०८.८८ | ७२.५८ | १८१.४६ |
| **एकूण** | **१७२८.१९** | **११५२.१३** | **२८८०.३२** |

परंतू, माहे मार्च, २०२० मध्ये राज्यात कोविड-१९ या संसर्गजन्य विषाणू रोगाच्या प्रादुर्भावाच्या पार्श्वभूमीवर वरीलप्रमाणे रु. १७२८.१९ लाख निधी राज्य शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात आला नसल्याने सद्यस्थितीत राज्य शासनाकडे सदर निधी उपलब्ध आहे.

सन २०१९-२० मध्ये वरीलपैकी अनुसूचित जमाती प्रवर्गाचा एकूण निधी रु. १८१.४६ लाख एवढया निधीस संदर्भ क्र. ९ वरील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती मात्र निधी वितरीत करण्यात आला नव्हता.

केंद्र शासनाच्या संदर्भ क्र. १० वरील पत्रान्वये सन २०१९-२० मधील अखर्चित निधी रु. २८८०.३२ लाख पैकी केंद्र हिस्सा रु. १७२८.१९ लाख एवढा निधी पुर्नजिवीत करुन मिळाला असून सदर निधी सन २०२०-२१ मध्ये खर्च करणेसाठी मान्यता प्राप्त झाली आहे.

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना सन २०२०-२१ मध्ये राबविण्याकरिता सर्वसाधारण प्रवर्गाकरिता केंद्र हिश्श्याचा रु. १४८९.७० लाख व त्यास अनुसरून रु.९९३.१४ लाख राज्य हिस्सा असा रू. २४८२.८४ लाख तसेच अनुसूचित जाती प्रवर्गाकरिता केंद्र हिश्श्याचा रु. १२९.६१ लाख व त्यास अनुसरून रु. ८६.४१ लाख राज्य हिस्सा असा रू. २१६.०२ लाख, अशा एकूण रू. २६९८.८६ लाख निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना, ९३२ गटांचा द्वितीय वर्षातील उर्वरीत घटक व तृतीय वर्षातील संपूर्ण घटकांचा कार्यक्रम राबविण्यासाठी **खालीलप्रमाणे प्रवर्गनिहाय एकूण रु. २६९८.८६ लाख** एवढया निधीस **प्रशासकीय मान्यता** देण्यात येत आहे.

(रु.लाख)

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा (६० टक्के) | राज्य हिस्सा (४० टक्के) | एकूण |
|---|---|---|---|
| सर्वसाधारण | १४८९.७० | ९९३.१४ | २४८२.८४ |
| अनुसूचित जाती | १२९.६१ | ८६.४१ | २१६.०२ |
| **एकूण** | **१६१९.३१** | **१०७९.५५** | **२६९८.८६** |

२. सदर निधी वरील परीच्छेद क्र. १ मध्ये प्रदान केलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार खर्च करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी. या प्रित्यर्थ होणारा खर्च चालू सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरीता मंजुर होणाऱ्या अनुदातून भागविण्यात येऊन खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**सर्वसाधारण प्रवर्ग-**

| केंद्र हिस्सा लेखाशिर्ष | राज्य हिस्सा लेखाशिर्ष |
|---|---|
| **मागणी क्रमांक -डी-३**<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(३५)(००)कृषी उन्नती योजन- परंपरागत कृषी विकास योजना (केंद्र पुरस्कृत योजना)<br>**केंद्र हिस्सा- ६०%**<br>**२४०१ ए ०५६** कार्यक्रम, ३३ अर्थसहाय्य | **मागणी क्रमांक -डी-३**<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(३६)(००) कृषी उन्नती योजन- परंपरागत कृषी विकास योजना (केंद्र पुरस्कृत योजना)<br>**राज्य हिस्सा -४० %**<br>**२४०१ ए ०६५** कार्यक्रम, ३३ अर्थसहाय्य |

**अनुसुचित जाती प्रवर्ग-**

| केंद्र हिस्सा लेखाशिर्ष | राज्य हिस्सा लेखाशिर्ष |
|---|---|
| मागणी क्रमांक -डी-३,<br>२४०१ पिक संवर्धन,<br>(००) ७८९, **अनुसूचित जाती उपयोजना**<br>(००)(२७) कृषि उन्नती योजना-परंपरागत कृषि विकास योजना (केंपुयो),<br>**केंद्र हिस्सा- ६०%**<br>**२४०१ ए७०८,**<br>योजनांतर्गत ३३ अर्थसहाय्य | मागणी क्रमांक -डी-३,<br>२४०१ पिक संवर्धन,<br>(००) ७८९, **अनुसूचित जाती उपयोजना**<br>(००)(२८) कृषि उन्नती योजना-परंपरागत कृषि विकास योजना (केंपुयो),<br>**राज्य हिस्सा -४० %**<br>**२४०१ ए७१७,**<br>योजनांतर्गत ३३ अर्थसहाय्य |

३. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे-

१. सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२. खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवून सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत. योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

३. योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चीत रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरूपात रकमा विचारात घेता येतील व संदिग्धता राहणार नाही.

४. कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

४. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रक्रियेचे/ वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत / P.W.D / मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/ नियम/परिपत्रक / तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील. त्यांनी या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला सर्व निधी सर्व जिल्हयांना पीएफएमएस (PFMS) प्रणालीव्दारे वितरीत करण्याची कार्यपध्दती बंधनकारक राहील.

५. सदर योजनेकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व सहाय्यक संचालक, लेखा १ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग- पहिला, उपविभाग तीन मधील अनु क्र. ४ येथील नियम २७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये काढण्यात येत आहेत. तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं -२०२०/ प्र.क्र.६५/अर्थ ३, दिनांक ०४.०५.२०२० व दिनांक २६.०५.२०२० मधील अटी व शर्तीची पुर्तता करण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९०३१२५७०७५८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2020.09.03 13:05:12 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
४. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर .
८. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
१०.सर्व प्रकल्प संचालक, आत्मा.
११.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१२. सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.